**औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील अनुसूचीत जाती घटक कार्यक्रमांतर्गत यंत्र सामुग्रीची कमतरता भरून काढणे ही जिल्हास्तरीय योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०२१/प्र.क्र.१०७/व्यशि- ३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय,मुंबई ४०० ०३२

दिनांक : ०९ फेब्रुवारी, २०२२

वाचा : संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र. १२/नियोजन/ अनु.जा.घ.का./ २०२१/प्र.क्र.३३/१४१, दि.३०.०९.२०२१ चे पत्र

प्रस्तावना :-

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागांतर्गत व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनेव्दारे औद्योगिक विविध कार्याकरीता लागणाऱ्या कुशल मनुष्यबळाच्या पुरवठा करणे, युवकांना रोजगाराभिमुख प्रशिक्षण देऊन कारखान्यात रोजगार मिळवण्यासाठी सक्षम बनविणे, युवकांना कौशल्ययुक्त प्रशिक्षण देऊन उत्पादन व इतर सेवा क्षेत्रामध्ये स्वंयरोजगार सुरू करण्यासाठी सक्षम बनविणे, कामगारांना योजनाबध्द प्रशिक्षण देऊन औद्योगिक आस्थापनांचा दर्जा,गुणवत्ता व उत्पादन वाढविणे हे मुख्य उद्देश आहेत.

२. औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील प्रशिक्षणार्थी प्रशिक्षण घेत असताना त्यांना रोजगारभिमुख प्रशिक्षण देऊन रोजगार मिळण्यास सक्षम बनविण्यात येते. प्रशिक्षणार्थ्यांना प्रशिक्षणाच्या माध्यमातून स्वत:च्या कतृत्वाबद्दल आत्मसंशोधन, विविध उपक्रमामधून क्रियाशिलता, सामाजिक ज्ञानाची व उत्पादनाच्या पध्दतीची माहिती मिळविणे सहज शक्य होते. स्वत: अथवा इतरांच्या सहाय्याने सांघिकरित्या काम करण्याचा विश्वास व जबाबदारीच्या जाणिवेची त्यांच्यामध्ये वाढ करण्यात येते. शिल्प कारागीर योजनेच्या माध्यमातुन प्रत्यक्ष प्रशिक्षणार्थ्यांना त्यांच्या आवडीच्या व्यवसायातील हत्यारे व उपकरणे, आवश्यकतेनुसार पुस्तके उपलब्ध करुन देण्यात येतात. जेणेकरुन प्रशिक्षणार्थी उत्तीर्ण झाल्यानंतर स्वत: रोजगार व स्वयंरोजगार करण्यास सक्षम होईल.

३. व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत कामगार व सेवायोजन (औ.प्र.संस्था) विकास क्षेत्रांतर्गत जिल्हास्तरीय योजनेतून अर्थसंकल्पीत झालेल्या तरतुदी व सदर तरतूदी खर्च होण्यासाठी शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनेंतर्गत औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जातीतील (नवबौध्दांसह) प्रशिक्षणार्थ्यांकरीता **औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील यंत्र सामुग्रीची कमतरता भरून काढणे** ही योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता

देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :-

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत कामगार व सेवायोजन (औ.प्र.संस्था) विकास क्षेत्रांतर्गत अर्थसंकल्पीत झालेल्या तरतुदी व दरवर्षी प्राप्त होणारा निधी खर्च होण्यासाठी शिल्प कारागिर प्रशिक्षण योजना, या योजनांतर्गत अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जातीतील (नवबौध्दांसह) प्रशिक्षणार्थ्यांकरीता **औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील यंत्र सामुग्रीची कमतरता भरून काढणे** ही योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेकरीता मार्गदर्शक सुचना खालीलप्रमाणे राहतील :-

१. सदर योजना जिल्हास्तरीय योजना असल्याने संबंधित जिल्ह्याच्या मागणी कार्यक्रमांतर्गत प्रधान लेखाशिर्ष २२२५ कामगार व सेवायोजन खाली नियतव्ययाची मागणी तसेच दरवर्षी निधी अर्थसंकल्पीत होण्यासाठी त्या त्या जिल्हा नियोजन समितीकडे संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी प्रस्ताव पाठविण्याची दक्षता घ्यावी.

२. सदर योजना जिल्हास्तरीय योजना असल्याने जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांचेकडून नियोजन विभागाकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या मार्गदर्शक सुचनेनुसार जिल्हा नियोजन समितीकडे निधीची मागणी करण्यात यावी.

३. या योजनेद्वारा उपलब्ध निधीतुन खरेदी करण्यात येणारी यंत्र सामुग्रीच्या रकमा व याद्या सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय यांनी सादर केल्यानुसार संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी अर्थसंकल्पीय नियम व वित्तिय अधिकार नियमपुस्तिकेनुसार तपासून तांत्रिक मान्यता द्यावी.

४. सदर योजना राबविण्यासाठी घटनादत्त आरक्षणानुसार अनुसूचित जाती प्रवर्गातील प्रशिक्षणार्थी यांची व्यवसाय अभ्यासक्रम निहाय प्रशिक्षणार्थ्यांना सदर प्रवर्गातील प्रवेशित प्रशिक्षणार्थ्यांची यादी व आवश्यक निधी मागणी संस्थाप्रमुखाने जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांना विहीत मुदतीत सादर करावी.

५. औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील यंत्रसामुग्रीची कमतरता भरुन काढणे या योजनेअंतर्गत करण्यात येणारी खरेदी शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार व मार्गदर्शक सुचनानुसार करण्यात यावी.

६. औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील यंत्रसामुग्रीची कमतरता भरुन काढणे या योजनेंतर्गत करण्यात येणारी खरेदी अतिरिक्त होणार नाही याची संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय मुंबई यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०९१११७१३११०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinod Sheshrao Bondre

Digitally signed by Vinod Sheshrao Bondre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4bd97b779f6f1e9e61491311a06aac663b01b00963f2e754c6ee2d5f7c14953d, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod Sheshrao Bondre
Date: 2022.02.09 11:19:08 +05'30'

**( विनोद बोंदरे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सह सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
५) उप सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
६) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
८) जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये (सर्व)
९) महालेखापाल ( लेखा वअनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१०) महालेखापाल ( लेखा वअनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
११) महालेखापाल ( लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१२) महालेखापाल ( लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१३) अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई,
१४) निवासी व लेखा परीक्षा अधिकारी ,मुंबई,
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय (सर्व)
१६) निवड नस्ती/ व्यशि-३